साहित्य प्रतिष्ठान

वर्ष ३ रे
अंक क्र.१०७

घर से मस्जिद बहोत दूर है यारो
चलो किसी रोते हुए बच्चे को हसाया जाये

नेटाक्षरी



# नेटाक्षरी

अतिथी संपादक
तन्वीर सिद्दीकी (छत्तीसगढ)

यजमान संपादक
स्वप्ना कोल्हे (नाशिक)

संपादक मंडळ
सोनाली घाटपांडे (पुणे),भारती सरमळकर (मुंबई),
सचिन काकडे (मुंबई),सारंग भणगे (पुणे),शशिकांत रणवरे (ठाणे)




# म्हणूनच,तुम्हाला हसविण्यासाठी नेटाक्षरी सज्ज झाले आहे

## ह्या अंकात वाचा

विनोदावर बोलू काही –

विनोदाच्या अगडबंब गुहेचा शोध घेतोय तन्वीर सिद्दीकी

हसना मना है ( Read at your own risk ) –

हास्याचा धुमाकूळ घालणाऱ्या कविता

























नेटाक्षरी हा विनामुल्य अंक नियमित मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय, प्रतिक्रियांसाठी netaksharee@gmail.com

# विनोदावर बोलू काही - - अतिथी संपादकाच्या लेखणीतून..

*आपण हसलो तर जग सोबत हसते म्हणे*
*आपण रडलो तर जग अजून जोरात हसते हे खरे*
*आपण काय केलंय ते बुवा कधी नाही मोजलंय*
*जगाला मात्र हसवलंय,त्याचं आयुष्य वाढवलंय*

पण,फक्त हसणे म्हणजेच विनोद नव्हे,नाही का? कारण हसणं हाच विनोद म्हटला तर लहान मुलांचे अजाण हसू,गुदगुल्या केल्यावर होणारी लोटपोट आणि सध्या फॅशनमध्ये असलेले हास्यवर्ग हे कशात मोडतील ?

आता विनोद म्हणजे नक्की काय? तो तयार करण्याचे गणित काय? हा तसा वादळी परिसंवादाचा विषय होऊ शकतो आणि मी खात्रीने सांगू शकतो की ह्या परिसंवादात भाग घेणाऱ्यांमध्ये प्रचंड शाब्दिक हाणामारी आणि गुद्देगुद्दी ही होऊ शकते अगदी संसदेत चालते त्याच्या तोडीस तोड इतकी.पण मला तरी अतिशयोक्ती,विडंबन,उपरोध,उपहास,अपेक्षाभंग,मूर्खपणा,फजिती आणि दोन अतुल्यबळांची झालेली स्पर्धा ही विनोदाची जन्मस्थळे वाटतात.आणि ह्या सोबत माणसाला उपजत विनोदबुध्दी असेल तर मग विनोदाची भट्टी जमलीच समजा.

आजकाल बहुतेक टिव्ही चॅनेल्सवर विनोदी धारावाहिकांचे पेव फुटलेले तुम्हाला आढळेल.त्यातला पाचकळ विषयांपासून आपण दोन हात दूर राहिलेलेच बरे.तसे नाही म्हणायला काही अपवादही आहेत उदा.हसता हसवता समाजातल्या गंभीर मर्मावर बोट ठेवणारे जसपाल भट्टींचे उल्टा-पुल्टा,फ्लॉप शो सारखे जुने पण टवटवीत धारावाहिक तर ऑफिस ऑफिस सारखे सरकारी कामकाजातल्या त्रुटी दर्शवणारे नवीन धारावाहिक.

तसं पाहिलं तर विनोदनिर्मिती कुठेही होते,होऊ शकते.जगात आल्यापासून 'जगतोय' हे कळल्यापासून ते अचानक नकळत मृत्यूच्या दारावर उभे राहेपर्यंत आपण अन्याय,दुःख,विरह,प्रेम,बोध कळतनकळत झेलतो,बघतो,वाचतो,आत्मसात करतो. त्यांचाच एक साथीदार म्हणजे विनोद.मराठी साहित्यात आचार्य अत्रे,पु.ल.देशपांडे यांसारख्या दिग्गजांनी विनोदास एक वेगळेच परिमाण प्राप्त करुन दिले ह्यात वाद नाहीच पण त्यातल्या त्यात सामाजिक विसंगतीतून,रोजच्या बारीकसारीक गोष्टीतून कसा विरंगुळा निर्माण होतो आणि ती वास्तविकता एका आशावादी भावनेने कशी स्वतःला न दुखावता बघता येते हे कळते. आपण आपल्याला स्वतःच कुठल्याही परिस्थितीत कसे खुश ठेवू शकतो,कसे समाधान देऊ शकतो हे समजावणे हेच या विनोदरावांचे काम.

मी लिहण्याची सुरुवात कधी केली ? ती कशी झाली वगैरे प्रश्न आजही मनात एखाद्या धूसर स्वप्नासारखेच आहेत, ज्याचा जन्म मला आजवर सांगता आला नाही आणि त्यामुळे त्याची गरज आणि कारणेही अनुत्तरित ! पण मी आत्तापर्यंत भरपूर विनोद रसे आस्वादली आहेत.पण काही ठराविकच सांगायची म्हटलं तर विडंबन हा प्रकार विनोदी भाषेत मांडण्याचा पायंडा रचणारे आचार्य अत्रे हे माझे पहिले आवडते लेखक.तसेच राम गणेश गडकरी.'वसंत ऋतू आला की झाडांना पालवी फुटते, आंब्याला मोहोर येतो,वक्त्यांना शब्द फुटतात,छत्र्यांना अभ्रे चढतात आणि पांढऱ्या सशाला पिल्ले होतात.' अशा त्यांच्या कित्येक छोटछोट्या कोटी आजही चवदार वाटतात आणि त्या वेगळ्या भाषेत सांगण्याचा बाज मन सुखावून जातो.त्यांच्या 'एकच प्याला' चा घोट घेतला तर त्यानंतर दारु आणि विसराळूपणावर अजून सरस विनोद कुणी रचूच शकणार नाही असे वाटते.

तसंच पु.ल.देशपांडेचं पण ! अगदी लहान लहान गोष्टींत त्यांच्या वेगळ्या नजरेचं विश्लेषण वाखाणण्याजोगं.'आगगाडीच्या डब्यातून कोणताही अवयव बाहेर काढायचा नाही.चौपाटीवरचा सूर्यास्त उलटा केला की पर्वतीवरचा सूर्योदय होतो.'ध' चा 'मा' ह्या नुसत्या ड्राफ्टींगच्या चूकीने नारायणरावांचा खून होतो म्हणजे काय?' ही त्यांची अगदी साधी पण दर्जेदार,निव्वळ विरंगुळा निर्माण करणारी 'बटाट्याच्या चाळीतील' वाक्ये आजही मन टवटवीत करतात.

तसं विनोदी लिहण्यावर आणि प्रसंगात विनोद होण्यावर काही विरोधाभास देखील आहेत,अजूनही होतात पण त्याचं उत्तर आचार्य अत्रेंच्या काही ओळींत कळेल,ते म्हणतात,विनोद हा स्वतः वाईट नाही पण त्याचे नातेवाईक फार आहेत. वात्रटपणा,गावंढळपणा,पांचटपणा,ग्राम्यता,अश्लीलता,बीभत्सपणा असे एकापेक्षा एक इरसाल असे त्याचे नातेवाईक आहेत.फक्त आपल्या बघण्याचा दृष्टिकोण आणि लिहणाऱ्याकडून वरील मर्यादेशी समांतर राहण्याची कला सांभाळली गेली की पुरे.

थोडक्यात,आपली दैनंदिनी एका अजब हास्यरसाने भरलेली आहे.तो रस फक्त आपल्याला शोधून काढता यायला हवा.मग हा रस दूधात साखर टाकण्याऐवजी मीठ टाकले गेले ह्यात चाखता येऊ शकेल,कोणी समोर रस्त्यावर चालणारा केळाच्या सालीवर घसरुन पडला ह्यात मिळू शकेल किंवा कुठल्याशा जाड ढोल्याला,अगदीच बुटक्याला,चित्रविचित्र म्हाताऱ्याला किंवा जास्त मेकअप केलेल्या मुलीला बघूनही तृप्त करु शकेल.पण या सर्वातून आत्मा सुखावतो हे मात्रं खरं बुवा.नाहीतरी आजच्या So Called प्रगत जगात जिथे दुसऱ्याला पेन देतांना सुध्दा टोपण आपल्याकडेच ठेवण्याची(ते चोरीला जाईल की काय ही भीती यामुळे) जी प्रथा आहे ती निदान विनोद या बाबतीत तरी होत नाही याची मला खात्री आहे.मी कोणाला आजवर हा माझा विनोद होता,तू का वापरलास?असे म्हणतांना ऐकलेले नाही.मग त्यावर कोण किती हसलं?याचेही हिशोब मांडणारे कोणी भेटले नाही(विचार करण्यासारखी गोष्ट आहे.)

खरंय,काही गोष्टी-घटना-वेळ आयुष्यात ठरवून येत नाही.असाच हा एक अतिथी आहे हा विनोदभाऊ मस्करे. जावेद अख्तर साहेबांनी खुप सुंदर लिहून ठेवलंय..

*सबका खुशीसे फासला एक कदम है,हर घर में बस एक ही कमरा कम है*

मग चला तर असंच हसत हसत पुढे जीवनाची वाटचाल करण्याचा प्रयत्न करुया.विनोदाचं जतन करुया.कारण कसे का असेना पण हा विनोद आपल्याला जगवणारा उपकारकर्ता आहे,पारदर्शी किंवा अपारदर्शी पण आहे.

ह्यावरुन निदा फाजली यांचा एक शेर आठवला..

*घरसे मस्जिद बहोत दूर है यारो,चलो किसी रोते हुये बच्चे को हसाया जाये..*

कित्ती सही लिहलंय,नाही ?खरंच,गांभीर्य आणि उदासीनतेने भरलेल्या आपल्या ह्या जीवनात एखाद्या निरागस जीवाच्या ओठांवर निखळ हसू फुलविणं हे एक प्रकारे पुण्यच आहे, एक अनोखी पूजा आहे. आणि आपण वयाने कितीही मोठे झालो तरी आपल्या प्रत्येकातले सुप्त लहान मूल कुठेतरी निराशेच्या गर्तेत आक्रंदत असते आणि त्यालाच निदान २ घटका का होईना मनमुराद हसवण्यासाठी आम्ही हा अंक प्रकाशित करायचे ठरवले.

तसं विचार केला तर कविता आणि विनोद ह्या अट्टाहासाने निर्माण करता येणाऱ्या गोष्टी नाहीत.आणि कुणी तसा व्यर्थ प्रयत्न करुही नये.त्यावर विनोदी कविताच करणे म्हणजे अजूनच दमछाक.पण रोजच्या धावपळीच्या जीवनात कळत नकळत घडत जाणाऱ्या अनेक लहानशा गोष्टी ज्या काही क्षण का असेना,किंचीत का असेना पण मनाला तुषारीत करुन जातात.अशाच काही गोष्टी,प्रसंग अफलातून कवितेतून आपल्या काही कवी मित्र मैत्रिणींनी चपखलपणे आपल्या लेखणीने नैसर्गिकतेने अन मोठ्या सरसपणे टिपल्या आहेत ज्या आम्ही या अंकात सादर करीत आहोत.

तसा मी एक चोखंदळ वाचक आहे.त्यात मला नेटाक्षरीचा अतिथी संपादक बनण्याची संधी मिळाली हा दुग्धशर्करा योग. तसे अतिथी संपादकीय लेख लिहिण्यासाठी अन्याय,दुःख,विरह,प्रेम,बोध असे भरपूर काव्यपदार्थ रसिकभूक भागवण्यास मला दिसत होते पण दूरवर कोपऱ्यात खुदूखुदू हसत बसलेला एक गुलाबजंबो माझं मन जिंकून गेला तो म्हणजे ‘विनोद’.

मला नेटाक्षरीच्या अतिथी संपादकपदाचा बहुमान दिल्याबद्दल स्वप्ना आणि ई साहित्य प्रतिष्ठानचे मी मनःपूर्वक आभार मानतो व पुढील वाटचालीसाठी अनेकानेक शुभेच्छा देतो.

- तन्वीर सिद्दीकी (छत्तीसगड )



**अतिथी संपादकाची ओळख –**

## तन्वीर सिद्दीकी

महाराष्ट्रात शिक्षण,भारतभर भ्रमण आणि आता छत्तीसगडला वास्तव्य.
निवडीने तंत्रज्ञान,वारसाहक्काने सामाजिक कार्यात रुची,व्यवसायाने अभियांत्रिक आणि अपघाताने साहित्यक्षेत्रात असलेला गडी !
दक्षिण कोरियाच्या कंपनीत तांत्रिक सल्लागार म्हणून कार्यरत.

# हसना मना है - - हास्याचा धुमाकूळ घालणाऱ्या कविता

**हो,कारण एकांतात ह्या कविता वाचून हसता हसता तुमचे जर पोट दुखायला लागले किंवा ऑफिसमध्ये वगैरे तुम्हाला असे एकट्याने हसतांना बघून जर सहकाऱ्यांनी तुम्हाला वेड्यात काढले तर आम्ही जबाबदार नाही बरं का ! त्यामुळे आमचा तुम्हाला प्रेमळ सल्ला की,कुणाला तरी सोबत घेऊनच हा अंक वाचा..**



** श्रावणातील संगणकाची कहाणी व व्रत **

ऐका परमेश्वरा संगणका,तुझी कहाणी
Silicon valley च्या नगरात
Intel चे मळे, HP तळे, Dell चा वृक्ष
Microsoft ची कमळें, Apple ची देवळे,रावळे

मनाचा संगणक मनी वसावा
हा वसा कधी घ्यावा?श्रावण्या चौथी घ्यावा

माही चौथी संपूर्ण करावा,त्याचे ७ वारात विभाजन करावे

त्यातील सोमवारी Facebook wall चे दर्शन घेऊ नये
फुकटच्या chatting विना मंगळवार जाऊ द्यावा
बुधवारी Twitting वर चिवचिवाट नको
गुरुवारी Email व्यर्ज करावी
इतर भटक्यांना शुक्रवारी poke करु नये
शनिवारी Youtube च्या मायाजालात गुंतू नये
आवडत्या Iphone ला रविवारी नावडते बनवावे

सहकुटूंब सहपरिवार मित्र मंडळींसह follow केल्यास मनःशांती
असा mouse मनी घ्याईजे,मनी पाविजे,चिंतीलं लाभिजे
मनीकामना हे keyboard निर्विघ्नं कार्यसिध्दी करिजे
रेणुका उवाच ही साठा उत्तरांची कहाणी पाचा उत्तरी सुफळ संपूर्ण

- रेणुका इनामदार

*माझी गांधीगीरी *

मुन्नाभाई पाहिला अन माझे नशीब फुटले,बायको पासून बॉसपर्यंत सारे गणित चुकले

दुसऱ्याच दिवशी बायकोने पाकिट माझे मारले,बससाठी तिच्याकडून दहा रुपये उसने मागितले
निषेध म्हणून मी मग मौनव्रत पाळले,जेवतांनाही फक्त खाल्ले भात आणि पिठले
लोकलमध्ये सुध्दा व्रत कष्टाने मी सांभाळले,हजार धक्के खाऊन सुध्दा तोंड नाही उघडले
खात होतो शिव्या तरी बोलत नव्हतो उलटून,
सगळ्या मित्रांनी मजा घेतली आलटून पालटून
ऑफिसातली फटाकडी नेहमी माझ्या जवळ येते,
सगळयांना मी सांगितले ती आई सारखी दिसते

माझ्या वागण्यात बदल पाहून बहुतेक देव जळू लागला,
शाप म्हणून माझ्या कपाळावर त्याने एक आरसा लावला



आरसा होता भारी,अंधारातही चमकायचा,
मनामधलं नेमकं समोरच्याला दाखवायचा
सगळयात आधी मार खाल्ला बायकोच्याच हातचा,
जवळ ती होती पण आरशात फोटो शेजारणीचा
बॉसला नेमका कसा आरशात गेंडा दिसला,
हात धरुन प्रेमाने त्याने घरचा रस्ता दाखवला
मित्राला तर आरशात दिसला साप आणि कोल्हा,
नेत्यासमोर आरशात दिसला भला मोठा कुत्रा
सरकारी ऑफिसात दिसले सगळयांना काळे कावळे,
भ्रष्टाचाराच्या चिखलात नाचणारे वरुन पांढरे बगळे
गांधीगीरीचा प्रयत्न मला चांगलाच भोवला,
जातायेता सगळयांकडून रग्गड मार खाल्ला

झक्कत गेलो देवाकडे,म्हटलं बाबा सोडव,
गांधीगीरीचं खुळ माझं तूच आता उतरव
देव तेव्हा खुश झाला,गालात हसून बोलला,
एकच होता महात्मा मी कष्टाने जन्माला घातलेला
त्याचीच होती ताकद गांधी म्हणून जगण्याची,
त्याचीच होती लायकी गांधीगीरी करण्याची
ऑफिस आणि घर एवढंच तुमचं जग,
चार भिंती आणि एक छप्पर एवढंच तुमच घर
गांधीगीरी करायची तर मन तसं कर,देवाला म्हटलं बाबा चूक झाली मला माफ कर
सोडून दिली गांधीगीरी,गायब झाला आरसा,पुन्हा वागू लागलो मी सामान्य माणसासारखा
तेव्हापासून आजपर्यंत मी सुखात जगतोय,पोटात असतं एक तरी तोंडाने दुसरंच बोलतोय

- महेंद्र कुलकर्णी उर्फ सॅम मन्नु (मुंबई)

## * आमचे हे रात्री अस्से घोरतात *

चोरी,दरोडे पडतात शेजारच्या घरी
आमच्या घरापासून चोर लांबच राहतात
अहो,पहारेकरी नाही काही दारी
आमचे हेच चोरांना पळवून लावतात
हत्यारांविना ते अशी करामत करतात
काहीच न करता,घराला उपयोगी पडतात
सांगतांना बाई लाज वाटते पण आमचे हे रात्री अस्से घोरतात



अस्से घोरतात हो अस्से घोरतात
जसे तोफांतून दारुगोळे सुसाट सुटतात
की चोर जीव घेऊन पळतच सुटतात
पळतच सुटतात हो धुम्म पळत सुटतात
आमचे हे रात्री अस्से घोरतात
रातराणी फुलते मागच्या अंगणी
चंद्र चांदण्यांचे झिम्मा फुगडी गुंजतात
अहो,छळायला नसतं कुणी एकांती
आमचे हेच युध्दाची तुतारी फुंकतात
चढत्या रातींची नशा उतरवतात
काहीच न करता,मला उपयोगी नसतात
सांगतांना बाई लाज वाटते पण आमचे हे रात्री अस्से घोरतात

अस्से घोरतात हो अस्से घोरतात
वैदूचे अंगारे,डॉक्टरचे फवारे सारेच फसतात
सारेच फसतात हो सारे उपायच फसतात
आमचे हे रात्री अस्से घोरतात
घोरतच राहतात हो घोरतच राहतात
घर्र घ्रर्र्र्र्र र घुर्र घुर्र घर्र घर्र

- स्वप्ना कोल्हे (नाशिक)

* जेव्हा कधी कुणाचं पोट जरा सुटू लागतं *

आम्ही म्हणालो,‘आजकाल पँट होत आहे टाईट’
सारे म्हणाले,‘अरे अरे बाबा,हे हार्टला फार वाईट’
यात नवीन काही नाही हो,लोकांच ज्ञान हे असंच उतू लागतं
जेव्हा कधी कुणाचं पोट जरा सुटू लागतं

कोणी म्हणे,‘बटाटे बंद आणि भात करा कमी’
जॉगिंग करा रोज,पोटवाढबंदीची देतो मी हमी
सल्ला ज्याला म्हणतात असं बरंच काही लोकांना सुचू लागतं
जेव्हा कधी कुणाचं पोट जरा सुटू लागतं

कोणी म्हणतं,‘रोज जिम ला जा,करा योगा’
ही म्हणते,‘आधी दुर्लक्ष केलं ना,आता भोगा’
यात नवीन काही नाही हो,बायकोचं डोकं हे असंच तापू लागतं
जेव्हा कधी कुणाचं पोट जरा सुटू लागतं

जीवनपध्दती साधी माझी,साधा सोप्पा व्यवहार
रोज घरचंच खातो आणि नाही हो राक्षसी आहार
हे आमचं सत्यवचनही सर्वांनाच केवळ एक पळवाट वाटू लागतं
जेव्हा कधी कुणाचं पोट जरा सुटू लागतं

- चंद्रजीत अशोक कांचन (पुणे)



*हजल *

कविता कशी म्हणू मी ? ते बाड फाटलेले
रागावूनी प्रियेने रद्दीत टाकलेले

जेव्हा मी लिहीत असतो हळवे खुले तराणे
अवलोकिते मला ती,डोळे वटारलेले

म्हणते कशास लिहीता कविता नी प्रेमपत्रे ?
काव्यामुळे कुणाचे कल्याण काय झाले ?

ती घातवेळ खास,जेव्हा तुम्हास वरले
कविपत्नी म्हणूनी घेणे नशीबास आज आले

डोळे मिटून बघतो रंगीत स्वप्न भव्य
आवरा म्हणे लवकरी पाणी नळास आले

तिज बसवूनी सामोरी मी प्रेमगीत गातो
म्हणते,'पुरे करा ते उकळीस दूध आले'

आता कसे करु मम कवितेस कोण वाली ?
म्हणूनी पुन्हा उचलले ते बाड फेकलेले

- साधना गोखले (पुणे)



* सख्खी शेजारीण *

शेजारच्या प्रियावहिनी..हो,लग्न झालेलं आहे म्हणून वहिनी म्हणायचं
शेजारच्या प्रियावहिनी अशा वागतात,समजत नाही काय करायच
प्रिया हे नाव माहेरचं की सासरचं,देव जाणे,पण नावाप्रमाणे वागतात
उगाचच पुढेपुढे करत जणू माझीच प्रिया बनायचा प्रयत्न करतात

रविवारी सकाळी मी बागेत झाडांची मशागत करत असतो
त्यावेळी कुंपणापलीकडून उगाच कुजबुजल्याचा आवाज येतो
बागवानीबद्दल नाही नाही ते प्रश्न विचारुन गप्पा मारायला लागतात
उगाचच पुढेपुढे करत जणू माझीच प्रिया बनायचा प्रयत्न करतात

दुपारी आम्ही दोघं निवांत जेवायला बसावं म्हणतो
तेवढ्यात डोअरबेलचा आवाज कानात किणकिणतो
'भाऊजींना आवडेल पहा'अळूवड्याची डिश समोर ठेवतात
उगाचच पुढेपुढे करत जणू माझीच प्रिया बनायचा प्रयत्न करतात

कधी संध्याकाळी घरी लवकर येऊन आरामात काहीतरी वाचावं
तेवढ्यात यांनी घरात शिरुन समोरच्या कोचावर ऐसपैस पसरावं
तुमचा व्यासंग मोठा म्हणत थोडा लघळपणाच करतात
उगाचच पुढेपुढे करत जणू माझीच प्रिया बनायचा प्रयत्न करतात

आमची ही तिला पाहूनच संतापते,बहाणा करुन दूसरीकडे नेते
किती टाळावं,आपला रुटीन बदलावा तरी 'तुम्हीच फूस लावता'ला उत्तरं नसतात
उगाचच पुढेपुढे करत जणू माझीच प्रिया बनायचा प्रयत्न करतात

अशा वेळी मी काय करावं तेच मला समजेनासं झालंय
किती टाळलं तरी आता पाणी बरंच डोक्यावरुन गेलंय
माझं बायकोवर खरंच प्रेम आहे,शपथा सुध्दा पुरेशा नसतात
उगाचच पुढेपुढे करत जणू माझीच प्रिया बनायचा प्रयत्न करतात

- कुमार मोकाशी (पुणे)



*जावई हा ठग *

जावई हा ठग
आहे लुच्चा फार
वेडा पिसा ठार
भासतसे

एक ह्याचे डोके
दुजा ह्याचा खिसा
दोन्हीही रिकामे
हाय देवा

ह्याचे नाम घेता
लागावीच चिंता
कामाचे वाटोळे
ठरलेले

ह्याचे चरणरज
सांडियेले जेथे
वादळ तेथे रे
हमखास

हेच दान देवा
मागते तुम्हासी
करा यास तुम्ही
हद्दपार

- रेणुका खटावकर रेपाळ (पुणे)



* दारू *

नशा आगळी आज मद्यात होती
अता धुंद मैफिल रंगात होती

किती पेग आले,किती रिक्त झाले
जणू काय टाकीच पोटात होती

कधी स्ट्रेट गेला कधी टॉप केला
कधी नीट व्हिस्कीच बर्फात होती

इथे वोडका हा तिथे ती टकीला
अता रेड वाईन ग्लासात होती

घड्याळात पाहून बाहेर आलो
तरी बाटली बाहुपाशात होती

पुन्हा आज ढोसून आलो घराला
पुन्हा बायको आज त्वेषात होती

तिने लाथ घातली माझ्या बुडाला
शिवीही तिची पूर्ण वाक्यात होती

पुन्हा झोपलो मी पुराण्या ठिकाणी
पुन्हा रात माझी,गटारात होती

- निरज कुलकर्णी (नाशिक)



*जा गेला उडत *



कित्ती प्रेम केलं मी जरी तरी गेलास ना मला सोडून
जायचं तर जा गेला उडत

मी पण नाही बघणार मागे वळून
माझं किती प्रेम होतं,किती जीव लावत होते
आता समोर ये कधी,बघ कशी कानाखाली वाजवते

कुठून बुध्दी आली तुला?
सोडून गेलास असा मध्येच मला
कावळयाचीच नजर तुझी ,दूसरी पोरगी दिसली असेल तुला

२ वर्षांच्या प्रेमात ६ शर्टस मी गिफ्ट केले
तुझं दूसरं लफडं तर कळू दे रे फक्त
माझं नाव नाही,जर तुला नाही भर चौकात उघडे केले

ज्या बाईक वरुन मला फिरवायचास
कळालं ती बाईक तुझी नव्हती
मलाच उशीरा जाग आली,तुझी माझ्याबरोबर
उभी राहण्याचीही लायकी नव्हती

पोरीला फिरवून आता तिला सोडून दिलं
असा जर विचार करत अश्शील तू
माझी हाय लागेल
१० पोरी सोडतील,टाळच पिटत बसशील तू

- स्मिता भरविरकर (मुंबई)

## * सावधान,कवी शिकतो आहे *

कवितेच्या गाडीत आजच बसला आहे
नको नको म्हणतांना बळेच घुसला आहे
आजच घेतलं आहे कवितेचं सुकाणू हातात
म्हणे मुक्तछंदातली कविता लोक कसे गातात ?
पहा कवितेच्या गाडीचा पहिला गिअर टाकतो आहे
सावधान,कवी शिकतो आहे



म्हणे सुरुवातीला थोडी चारोळी ट्राय करतो
मग हवे तर खुशाल मुक्त कुरणात चरतो
मला कुणाचा म्हणे आधार नको आहे
आता पुन्हा कसलीच माघार नको आहे
राइट लेफ्ट विसरुन गाडी सुसाट हाकतो आहे
सावधान,कवी शिकतो आहे

या वाटेवरच्या बऱ्याच कविता पार झाल्यात
२ यमके ४ ओळी कधीच ठार झाल्यात
तुम्हालाही भारी पडेल कवीची ही स्वारी
वरुन पुन्हा प्यारी वाटेल कवीची ती सॉरी
कवितेच्या वाटेचा हरेक सिग्नल चुकतो आहे
सावधान,कवी शिकतो आहे

हवे कशाला म्हणे मात्रा आणि व्रतांचे कोंदण
नको आहे कुठलेच अलंकारांचे गोंदण
हा मोडतो मीटर याला आवडते स्पीड
सुसाट वेगाला म्हणे हवे कशाला बंधन?
तुम्ही प्लीज साईड द्या आता ब्रेकही थकतो आहे
सावधान,कवी शिकतो आहे

उद्या तक्रार नको डोकं जड झाल्याची
कवीची गाडी आणि शब्दं डोक्यावरुन गेल्याची
याचे चान्सेस कमी आहेत या मार्गावर थकण्याचे
याच्याकडे अधिकत लायसेन्स आहे कविता शिकण्याचे
रोज नवा धडा म्हणून एक नवी कविता फेकतो आहे
सावधान,कवी शिकतो आहे

- रमेश ठोंबरे (औरंगाबाद)

*एक डेट, प्रश्न अनेक*

ट्रिंग ट्रिंग
अंजू,हो आज ५ वाजता
(पगार पण झाला आहे नुकता)
गर्लफ्रेंडला बोलावले तर खरे
पण,आज पहिलीच भेट..तिला नेणार कुठे?
आपल्याच खर्चाची बोंब..
बापाची लुना नेली तरी जाणार कुठे?
पेट्रोलचे भाव हवेत गेलेले
बबनच्या गाडीचा ३० चा ऍवरेज
चालत चालत समोरच्या बागेत गेलो तर
आयताच संपूर्ण चाळीला थेट कव्हरेज
कांदाभजी साठी तर घ्यावे लागेल कर्ज
पिज्जाहटला करावा लागेल १ तास पहिले अर्ज
सिनेमाला जायचं तर तिकीटे असतील ब्लॅक
त्यावर पॉपकॉर्न,कोल्डड्रिंक्सचा परवडेल का रुबाब ?
पावभाजी वाटते ठीक पण एक्स्ट्रा पाव परवडणार नाही
मुरमुरे खात फिरलो तर ऑड वाटेल,इंप्रेशन पडणार नाही
कबाब खाऊ घालू तर होतील आपलेच ४ दिवसाच्या खायचे वांदे
(प्रेमासाठी कसे परवडेल वाट्टेल ते?)
उपाशी फिरलो तर प्रेम व्यक्त होणार नाही
तिला एक ड्रेस गिफ्ट देणं ? छे,मुळीच जमणार नाही
भेटलोच नाही तर ? निदान अब्रू तरी जाणार नाही
इंटरनेटवरचं व्हर्च्युअल प्रेमच बरं
निदान खिशाला कात्री तरी लागणार नाही
काय हा पगार आणि काय ही महागाई
मला सांगा,तरुणांनी प्रेम करावं की नाही?
एवढ्या प्रयत्नानंतर एक पोरगी पटली
तिला घेऊन जरा कुठे फिरावं म्हटलं तर महागाईने भोकं पाडली
ट्रिंग ट्रिंग
हा अंजू,आज जरा तबियत ठीक नही है
फिर कभी मिलते है
(आशिक की दुनिया उम्मीद पे कायम है)



- तन्वीर सिद्दीकी (छत्तीसगड)

# I ♥ things that make you :)

मराठी साहित्य रसिकांना नेहमी उत्तमोत्तम व नाविन्यपूर्ण साहित्य पुरवण्याचा ई साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडत आहे.दरवेळी ईमेलने येणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाणतो.ह्याच प्रोत्साहनाच्या बळावर नेटाक्षरीने हल्लीच आपला शतकोत्सव साजरा केला.हा अंक सध्या सुमारे ९५००० रसिकांना ईमेलने मोफत वितरीत केला जातोय.सोबतच मागील सर्व प्रकाशित अंक वाचण्यासाठी **www.esahity.com** ह्या आमच्या संकेतस्थळाला भेट देणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे.हे अंक तुम्ही आपल्या फ्रेंडलिस्टला Fwd करुन त्यांनाही ह्या आनंदयात्रेत सहभागी करुन घ्यावे हा आमचा प्रेमळ आग्रह. त्याच ईमेलची cc **netaksharee@gmail.com** वर आम्हाला दिल्यास पुढील अंक आम्ही त्यांनाही नियमित पाठवत राहू.मराठी भाषेची लोकप्रियता दिवसेंदिवस वाढत जाण्यास आपला हातभार लागावा असे कुठल्या मराठी भाषिकास नाही वाटणार ? ह्याच विश्वासाच्या बळावर आपल्यासारख्या दर्दी रसिकांच्या सहाय्याने नेटाक्षरी लवकरच लाखाचाही पल्ला पार करील अशी आम्हांला खात्री आहे.

## आमची इतर ई प्रकाशने –

विनोदाचा दादा-ई स्टॉप,कवितांचा आवाज-स्वर नेटाक्षरी,मुलांचा नेट प्रवेश-बालनेटाक्षरी,महाराष्ट्राचं वैभव-दुर्ग दुर्गट भारी

## आमची प्रकाशित ई पुस्तके –

टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,चार क्षण,तो आणि ती,प्रियेचे अभंग, देशी दारुचे दुकान, ई शाळा,तो मी आणि सिगरेट,मोरया,लोकल गोष्टी,मीरा(मराठी अनुवाद), ओथंब,सावळ्या मुलीची गाणी,सईची वही,लालनाक्या,ओथंब २,कृष्णा,व्याख्या प्रेमाची

वरील ई पुस्तके मोफत मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय,प्रतिक्रिया,स्वलिखित साहित्य पाठवण्यासाठी – **www.esahity.com**

नेटाक्षरी हा विनामुल्य अंक नियमित मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय, प्रतिक्रियांसाठी - **netaksharee@gmail.com**

ई साहित्यची सर्व प्रकाशने cd मध्ये देखील उपलब्ध आहेत.

संपर्क करा – ९८६९६७४८२०



*YOU ARE NOT FULLY DRESSED UNTILL YOU WEAR A* ☺

# नेटाक्षरी